**राजर्षी छत्रपती शाहू महाराज शिक्षण शुल्क शिष्यवृत्ती योजनेतील सन २०१९-२० मधील शिष्यवृत्तीची रक्कम अदा करण्यास मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्र. अर्थसं-२०१९/(प्र.क्र.६७/१९)/मशि-३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार इमारत, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- ०९ डिसेंबर, २०१९

**वाचा :-** संचालक,उच्च शिक्षण, पुणे यांचे पत्र क्र. उशिसं/शिष्य-२०१९-२०/अनौपचारिक संदर्भ/१५८०३, दि.०५.१२.२०१९

**प्रस्तावना :**

संचालक, उच्च शिक्षण पुणे यांच्या संदर्भाधीन दि.०५.१२.२०१९ रोजीच्या पत्रास अनुसरुन राजर्षी छत्रपती शाहु महाराज शिक्षण शुल्क शिष्यवृत्ती योजनेसाठी सन २०१९-२० मध्ये महाऑनलाईन कार्यालयाकडुन अलॉटमेंट प्राप्त झालेल्या ४३६८७ विद्यार्थ्यांची शिष्यवृत्तीची रक्कम अदा करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

राजर्षी छत्रपती शाहू महाराज शिक्षण शुल्क शिष्यवृत्ती योजना या योजनेतील सन २०१९-२० मधील शिष्यवृत्तीची रक्कम अदा करण्यासाठी येणाऱ्या रु.१०,०७,३९,२६२/- (रुपये दहा कोटी सात लक्ष एकोणचाळीस हजार दोनशे बासष्ट फक्त) इतक्या खर्चास मान्यता देण्यात येत आहे.

२. या बाबीवर येणारा खर्च "मागणी क्र. डब्ल्यु-०२, २२०२ सर्वसाधारण शिक्षण, ८० सर्वसाधारण ८०० इतर खर्च, (०२)(०९) ज्यांचे किंवा ज्यांच्या पालकांचे वार्षिक उत्पन्न रु.८.०० लक्ष पेक्षा अधिक नाही अशा विद्यार्थ्यांना फी माफी (२२०२ १४५६) ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर)" या लेखाशिर्षाखाली सन २०१९-२० या आर्थिक वर्षातील मंजूर तरतुदीतून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय, वित्त विभाग परिपत्रक क्र. अर्थसं-२०१९/ प्र.क्र.९२/ अर्थ-३, दि.०८.०७.२०१९ मधील अटी व शर्तीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत असुन सदर परिपत्रकासोबतच्या परिशिष्टातील अटी व शर्तीची पुर्तता होत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असुन त्याचा संकेतांक क्र. २०१९१२०९१५५९०२९६०८ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Hemantkumar Pandharinath Baviskar
Digitally signed by Hemantkumar Pandharinath Baviskar
Date: 2019.12.09 16:03:19 +05'30'

**( हे. पं. बाविस्कर )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. संचालक, उच्च शिक्षण, पुणे.

२. महालेखापाल लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
३. महालेखापाल लेखापरीक्षा, महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
४. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
५. कार्यासन (साशि-१/मशि-२), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
६. निवडनस्ती, कार्यासन मशि-३.